**महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ममुवि २०१६/प्र.क्र.८/एसडी-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १४ जुलै, २०१७

प्रस्तावना :-

राष्ट्रीय शैक्षणिक धोरण, १९८६ आणि त्या अनुषंगाने प्रसिध्द करण्यात आलेल्या कृती आराखड्यामध्ये मुक्त शिक्षणावर भर देण्यात आलेला आहे. तद्नंतरही वारंवार अनेक शिक्षण तज्ज्ञ, संस्था यांचेकडून व्यवसायाभिमुख शिक्षण आणि मुक्त शिक्षण यांची महत्वपूर्ण भूमिका अधोरेखित करण्यात आलेली आहे. मुक्त शिक्षणाची गरज जगातील अनेक देशांनी ओळखली असून त्यांनी मुक्त शिक्षणाची कल्पना स्वीकारलेली आहे.

२. केंद्र शासनाच्या मानव संसाधन विकास मंत्रालयाने राष्ट्रीय मुक्त शिक्षण संस्था (National Institute of Open Schooling - NIOS) ही स्वतंत्र यंत्रणा निर्माण करुन १९८९ मध्ये मुक्त शिक्षणाचा पाया घातला. सध्या राष्ट्रीय मुक्त शिक्षण संस्थेची देशभरात ११ विभागीय केंद्रे, तीन उपविभागीय केंद्रे, तीन हजार संलग्न संस्था (AIS) आणि व्यावसायिक संस्था (AVIS) कार्यरत आहेत. या तीन हजार अभ्यास केंद्राचे जाळे भारत, नेपाळ आणि मध्य पूर्वेत पसरलेले आहे. असे जरी असले तरीही देशाची एकूण भौगोलिक व्याप्ती आणि प्रादेशिक गरजांचा विचार करता राज्यांनीही स्वत:च्या स्तरावर प्रयत्न करण्याची गरज असल्याने, NIOS यासाठी सर्व राज्यांना प्रोत्साहन आणि मार्गदर्शन देत आहे. देशात सध्या १५ राज्ये व १ केंद्रशासित प्रदेशामध्ये राज्यस्तरावरील मुक्त विद्यालय मंडळ सुरू आहेत.

३. शिक्षणामुळे मनुष्याच्या विचारांचा पाया भक्कम होतो. शिक्षण ही जीवनाच्या प्रत्येक अंगाला स्पर्श करणारी व पूर्णत्वाकडे नेणारी निरंतर प्रक्रिया आहे. माणसाचा सामाजिक व आर्थिक स्तर सुधारण्यात शिक्षणाचे महत्वपूर्ण योगदान आहे. समाजातील प्रत्येक घटकातील मूल शिकले पाहिजे याकरिता अनेक योजना शासनामार्फत राबविण्यात येत आहेत. तरीही अनेक विद्यार्थी काही कारणास्तव शिक्षणापासून वंचित राहत असल्याचे तसेच,शिक्षणाच्या मुख्य प्रवाहातून बाहेर पडत असल्याचे दिसून येत आहे. सद्यस्थितीत इयत्ता १ ली ते इयत्ता १० वी पर्यंतच्या शैक्षणिक प्रवासात राज्यातील अंदाजे ५ लक्ष विद्यार्थ्यांची विविध टप्प्यांवर गळती होत असल्याची बाब निदर्शनास आली आहे. यामध्ये मुलींच्या गळतीचे प्रमाण चिंताजनक आहे.

४. राज्यमंडळ गेली कित्येक वर्षे बहिस्थ विद्यार्थी योजना (खाजगी विद्यार्थी थेट परीक्षा योजना - फॉर्म नं १७) राबवित आहे. सदर योजनेतंर्गत राज्यात सुमारे १ लाख ते १.५० लाख विद्यार्थी प्रतिवर्षी प्रविष्ट होतात. प्रस्तुत प्रमाणे मिळणारा प्रतिसाद समाधानकारक असला, तरीही विषय निवडीबाबत या योजनेत लवचिकता नाही. नियमित विद्यार्थ्यासाठी जे विषय, अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तके आहेत, तीच बहिस्थ विद्यार्थी यांच्यासाठी वापरण्यात येतात. त्यामुळे अनुत्तीर्णतेचे प्रमाण सदर योजनेत जास्त आहे. सबब, शिक्षण घेण्याची इच्छा आणि गरज असणाऱ्या व्यक्ती या शिक्षणापासून वंचित राहत असल्याचे दिसून येते. तसेच काही जणांना इच्छा असूनही शिक्षण प्रवाहातून बाहेर पडावे लागते.

**बहिस्थ विद्यार्थी योजनेच्या मर्यादा पुढीलप्रमाणे :-**

१) या विद्यार्थ्यांना नियमित विद्यार्थ्यांना शिकविला जाणारा अभ्यासक्रम जसाच्या तसा अभ्यासावा लागतो. ते कठीण जाते.
२) नियमित विद्यार्थ्यासाठीचीच पाठ्यपुस्तके वापरावी लागतात.
३) प्रश्नपत्रिका व मूल्यमापन नियमित विद्यार्थ्याप्रमाणेच असते.

४) या विद्यार्थ्यांनी संपादन केलेले व्यावहारिक ज्ञान, व्यावसायिक कौशल्ये आणि गरजा यांचा वेगळा विचार सध्याच्या व्यवस्थेत नाही.
५) विशेष गरजा असणाऱ्या व्यक्तींसाठी पुरेशी व्यवस्था बहिस्थ विद्यार्थी योजनेत नाही.
६) फक्त तज्ज्ञ आणि प्रशिक्षित शिक्षकांमार्फतच शिक्षणाचे कार्य होत असल्याने अनौपचारिकतेला व सुलभ संपर्काला मर्यादा येतात.

५. सध्याच्या संगणक व तंत्र युगात व्यवसाय व कौशल्यावर आधारित स्वयंरोजगार करणाऱ्या व्यक्तीसही शिक्षण घेण्याची गरज अधोरेखित झाली आहे. बहिस्थ विद्यार्थी योजनेच्या मर्यादा विचारात घेता, मुक्त विद्यालय योजना अंमलात आणण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. मुख्यत्वाने शिक्षणापासून वंचित राहिलेल्या व शिक्षणाच्या मुख्य प्रवाहातून दूर गेलेल्यांना पुन्हा शिक्षणाची संधी उपलब्ध करुन देण्याचा उद्देश राज्य मुक्त विद्यालय मंडळ स्थापन करण्यामागे आहे. त्यामुळे महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ स्थापनेचा प्रस्ताव महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ,पुणे (राज्य मंडळ) यांच्याकडून सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

१. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ स्थापन करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तावित मंडळ राज्यमंडळाचा एक भाग म्हणून कार्यान्वित राहील. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय योजनेत प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षा व उच्च माध्यमिक प्रमाणपत्र परिक्षा यांचा समावेश असेल. सदर परिक्षांना शासनाच्या नियमित अनुक्रमे इ.५ वी, इ.८ वी, इ.१० वी व इ.१२ वी परिक्षांची समकक्षता राहील. सदर समकक्षता शासनाच्या शिक्षण व रोजगाराच्या उपलब्ध असणाऱ्या संधी साठीही लागू राहील.

**२. मुक्त विद्यालयाची उदिष्टे-**

१) औपचारिक शिक्षणाला पूरक आणि समांतर अशी शिक्षण पध्दती सुरु करणे.
२) शालेय शिक्षणातील गळती आणि अनुत्तीर्ण होण्याचे प्रमाण कमी करणे.
३) शिक्षण घेऊ इच्छिणारे प्रौढ व्यक्ती, गृहिणी, कामगार या सर्वांना शिक्षणाच्या संधी उपलब्ध करून देणे.
४) जीवनाला उपयुक्त असे व्यवसायाभिमुख शिक्षण देणे.
५) सुशिक्षित आणि जागरुक नागरिक बनविणे.
६) स्थानिक स्तरावर शिक्षणाची सुविधा उपलब्ध करुन देणे.
७) दिव्यांग विद्यार्थ्यांना उपयुक्त अशी शिक्षणाची सुविधा उपलब्ध करुन देणे.

**३. मुक्त विद्यालयाची वैशिष्ट्ये-**

१) सोयीनुसार अध्ययनाची सवलत.
२) अभ्यासक्रमाची लवचिकता.
३) व्यवसायिक विषयांची उपलब्धता.
४) संचित मूल्यांकनाची व्यवस्था (Transfer of Credit)
५) सर्वांसाठी शिक्षणाची व्यवस्था.
६) दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी विशेष व्यवस्था.

**४. मुक्त विद्यालयासाठी प्रवेश पात्रता -**

(अ) प्राथमिक स्तर : इयत्ता ५ वी (समकक्ष)

१. नोंदणी करतांना उमेदवाराचे वय १० वर्षे पूर्ण असावे. कमाल वयाची अट नाही.
२. वयाचा दाखला सादर करावा लागेल.
३. पूर्वी औपचारिक शाळेत गेला असल्यास, पूर्वीच्या शाळेचा शाळा सोडल्याचा दाखला /प्रमाणपत्र आवश्यक.
४. औपचारिक शाळेत गेला नसल्यास, स्वयंघोषित प्रमाणपत्र (वय वर्ष १८ पेक्षा जास्त असल्यास) द्यावे लागेल.
५. औपचारिक शाळेत गेला नसल्याबाबतचे पालकांचे प्रतिज्ञापत्र (वय वर्ष १८ पेक्षा कमी असल्यास).

(ब) उच्च प्राथमिक स्तर : इयत्ता ८ वी (समकक्ष)

१. नोंदणी करतांना उमेदवाराचे वय १३ वर्षे पूर्ण असावे. कमाल वयाची अट नाही.
२. वयाचा दाखला सादर करावा लागेल.
३. पूर्वी औपचारिक शाळेत गेला असल्यास, पूर्वीच्या शाळेचा शाळा सोडल्याचा दाखला / प्रमाणपत्र.
४. औपचारिक शाळेत गेला नसल्यास, स्वयंघोषित प्रमाणपत्र द्यावे (वय वर्ष १८ पेक्षा जास्त असल्यास).
५. औपचारिक शाळेत गेला नसल्याबाबतचे पालकांचे प्रतिज्ञापत्र (वय वर्ष १८ पेक्षा कमी असल्यास).

(क) माध्यमिक स्तर : इयत्ता १० वी ( माध्यमिक शालांत परिक्षा समकक्ष)

१. नोंदणी करताना उमेदवाराचे वय १५ वर्ष पूर्ण असावे, कमाल वयाची अट नाही.
२. वयाचा दाखला सादर करावा लागेल.
३. उमेदवार किमान पाचवी उत्तीर्ण असावा.
४. उमेदवार किमान दोन वर्षे महाराष्ट्राचा रहिवासी असावा. (रहिवासीसाठी उचित पुरावा सादर करावा लागेल. उदा. आधारकार्ड / रेशनकार्ड / डोमेसाइल / बँकेचे पासबुक / दूरध्वनी देयक / वीज देयक / नोकरीच्या ठिकाणाचे ओळखपत्र इत्यादी.)
५. नोंदणी करतेवेळी उमेदवाराचे कोणत्याही शाळेच्या पटावर नाव नसल्याचे प्रतिज्ञापत्र देणे आवश्यक. (प्रतिज्ञापत्राचा नमुना आवेदनपत्रामध्येच उपलब्ध असेल)
६. राज्य मंडळाच्या माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षेत अनुत्तीर्ण झालेला उमेदवार उपरोक्त ५ क्रमांकाच्या अटीची पूर्तता करून मुक्त विद्यालय योजनेत सहभागी होऊ शकेल. या विद्यार्थ्यांना TOC (Transfer of Credit) चा फायदा देण्यात येईल. मात्र प्रतिबंधित (डीबार) विद्यार्थ्यांस प्रवेश दिला जाणार नाही.

(ड) उच्च माध्यमिक स्तर : १२ वी (उच्च माध्यमिक शालांत परिक्षा समकक्ष)

१. नोंदणी करताना उमेदवारांचे वय १७ वर्षे पूर्ण असावे. कमाल वयाची अट नाही.
२. उमेदवार कोणत्याही मान्यताप्राप्त परीक्षा मंडळाची इ.१० वी किंवा तत्सम परीक्षा उत्तीर्ण असावा.

३. उमेदवार महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाव्यतिरिक्त अन्य परीक्षा मंडळाची इ. १० वी परीक्षा उत्तीर्ण असल्यास किमान दोन वर्षे महाराष्ट्राचा रहिवासी असावा. (रहिवासीसाठी उचित पुरावा सादर करावा लागेल. उदा. आधारकार्ड / रेशनकार्ड / डोमेसाईल / बँकेचे पासबुक / दूरध्वनी देयक / वीज देयक / नोकरीच्या ठिकाणाचे ओळखपत्र इत्यादी).

४. महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाच्या उच्च माध्यमिक परीक्षेत अनुत्तीर्ण झालेले उमेदवार नोंदणी करुन या योजनेत सहभागी होऊ शकेल. अशा विद्यार्थ्याला TOC (Transfer of Credit) चा फायदा मिळेल.

**५. नोंदणी** :

१. मार्च / एप्रिलमध्ये होणाऱ्या परीक्षेसाठी परिक्षेपूर्वी ६ महिन्याच्या कालावधीत नाव नोंदणी करता येईल.

२. ऑक्टोबर / नोव्हेंबरमध्ये होणाऱ्या परीक्षेसाठी परिक्षेपूर्वी ६ महिन्याच्या कालावधीत नाव नोंदणी करता येईल.

३. एकदा केलेली नोंदणी पाच वर्षांसाठी वैध राहील.

४. या नोंदणीद्वारे सलग पाच वर्षे किंवा सलग नऊ परीक्षांची संधी दिली जाईल.

५. पुनर्नोंदणीची सुविधा उपलब्ध राहील. पुनर्नोंदणीचा कालावधी व परीक्षांची संधी उपरोक्त क्र. १ व २ प्रमाणे राहील.

६. पुनर्नोंदणी केल्यानंतरही यापूर्वीच्या परीक्षेस मिळालेली सूट ग्राह्य धरली जाईल.

**६. अभ्यासक्रम , विषय योजना व मूल्यमापन :**

महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाकरिता अभ्यासक्रम हा नियमित अभ्यासक्रमापेक्षा वेगळा असेल. त्याची विषय योजना, व्याप्ती, उद्दिष्टे, मूल्यमापन योजना या सर्व बाबी मुक्त विद्यालय योजनेशी सुसंगत अशा राहतील. पारंपरिक शिक्षणातील आवश्यक असे संबोध आणि कौशल्ये संपादित करुन स्वत:च्या व्यवसायात त्याचे उपयोजन करण्याची क्षमता निर्माण होण्यासाठी खालील विषयांबरोबर विविध अभ्यासक्रम तयार केले जातील.

विविध विषयांचे अभ्यासक्रम, विषययोजना तयार करण्याचे स्वातंत्र्य व अधिकार महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळास राहतील. National Skill Qualification Framework (NSQF) वर आधारित व्यवसाय विषय तसेच कौशल्य विकासाशी संबंधित विविध विषय राज्य मुक्त विद्यालय मंडळामार्फत उपलब्ध करुन देण्यात येतील.

राज्य मुक्त विद्यालय मंडळांमार्फत उपलब्ध करुन देण्यात येणाऱे अभ्यासक्रम, मूल्यमापन याकरिता शासनाची मान्यता घेणे आवश्यक राहील. खाली नमूद विषययोजनेमध्ये बदल करावयाचा झाल्यास त्याला शासनाची मान्यता घेणे आवश्यक राहील.

**७. विषय योजना :-**

(अ) **<u>प्राथमिक स्तर (इयत्ता ५ वी समकक्ष)</u>**

१. प्रथम भाषा (प्रचलित नियमांप्रमाणे)

२. द्वितीय भाषा (प्रचलित नियमांप्रमाणे)
३. तृतीय भाषा (प्रचलित नियमांप्रमाणे)
४. परिसर अभ्यास
५. गणित

उपरोक्त ५ विषयांपैकी सर्व विषयांत उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

(ब) **<u>उच्च प्राथमिक स्तर (इयत्ता ८ वी समकक्ष)</u>**

१. प्रथम भाषा (प्रचलित नियमांप्रमाणे)
२. द्वितीय भाषा (प्रचलित नियमांप्रमाणे)
३. तृतीय भाषा (प्रचलित नियमांप्रमाणे)
४. सामाजिक शास्त्र
५. विज्ञान
६. गणित
७. National Skill Qualification Framework (NSQF) व्यवसाय / कौशल्य विकास विषय
८. दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी विशेष विषयांची तरतूद

उपरोक्त विषयांपैकी कोणतेही ५ विषय (२ भाषा विषय अनिवार्य) घेणे आवश्यक आहे व या ५ विषयांमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

**(क) <u>माध्यमिक स्तर (इयत्ता १० वी समकक्ष)</u>**

खाली नमूद विषयांपैकी कोणतेही ५ विषय (२ भाषा विषय अनिवार्य) घेणे आवश्यक आहे व या ५ विषयांमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

(१) अनिवार्य विषय

१. प्रथम भाषा
२. द्वितीय भाषा
३. तृतीय भाषा

(टीप : अनिवार्य विषयांपैकी मराठी हा विषय सक्तीचा राहील. याव्यतिरिक्त प्रथम, द्वितीय व तृतीय भाषांपैकी कोणताही एक भाषा विषय निवडता येईल)

४. भाषेतर विषय / शालेय वैकल्पिक विषय (कमाल ३ विषय)
   १. विज्ञान आणि तंत्रज्ञान
   २. गणित
      अंकगणित फक्त दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी
      (विशेष गरजा असलेले उमेदवार)
   ३. सामाजिक शास्त्रे (इतिहास व भूगोल, नागरिकशास्त्र)
   ४. NSQF व्यवसाय विषय
   ५. अर्थशास्त्र
   ६. वाणिज्य
   ७. कृषिविज्ञान व तंत्रज्ञान

८. NSQF व्यवसाय / कौशल्य विकास विषय

९. शालेय वैकल्पिक विषय - पूर्व व्यावसायिक विषय (कमाल एक विषय)

१. बेकरी उत्पादन
२. शिवण यंत्राद्वारे शिलाई व शिवणयंत्राची निगा व दुरूस्ती
३. घरगुती विद्युत उपकरणे
४. स्क्रीन प्रिंटींग
५. इलेक्ट्रॉनिक तंत्रज्ञान
६. व्यवसाय मार्गदर्शन
७. भारतीय संगीत
८. निवासी जलव्यवस्थापन
९. सृजनात्मक कलानिर्मिती
१०. शालोपयोगी साहित्य निर्मिती
११. पाककला
१२. हस्तभरतकाम, क्रोशाकाम व लोकरीचे विणकाम
१३. वस्त्रधुलाई
१४. उद्यान विद्या
१५. वाणिज्य व पुस्तपालन मूलतत्वे
१६. शाश्वत शेती
१७. बाटीक कला
१८. चित्रकला
१९. शेती पूरक व्यवसाय
२०. मऊ खेळणी
२१. कृषिविद्या
२२. संगणक देखभाल व दुरुस्ती
२३. मोबाईल देखभाल व दुरुस्ती

(टीप : १. पुढील शिक्षणासाठी विज्ञान शाखेत प्रवेश घ्यावयचा असल्यास विज्ञान विषयात उत्तीर्ण होऊन किमान पात्र गुणांची अट ३५ % पूर्ण करणे अनिवार्य आहे.
२. शालेय वैकल्पिक विषयांपैकी किमान ३ विषय घेणे अनिवार्य राहील.)

**(ड) उच्च माध्यमिक स्तर (इयत्ता १२ वी समकक्ष)**

खालील विषयांपैकी कोणतेही ५ विषय (२ भाषा विषय अनिवार्य) घेणे आवश्यक आहे व या ५ विषयांमध्ये उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

(१) अनिवार्य विषय (कोणतेही दोन)

१. इंग्रजी
२.मराठी
३. हिंदी

४. उर्दू
५. संस्कृत

**(२)** ऐच्छिक विषय - (कोणतेही तीन)

**कला शाखा**

१. इतिहास
२. भूगोल
३. राज्यशास्त्र
४. समाजशास्त्र
५. तत्वज्ञान
६. मानसशास्त्र
७. अर्थशास्त्र
८. सहकार
९. शिक्षणशास्त्र
१०. संरक्षणशास्त्र
११. तर्कशास्त्र
१२. गणित आणि संख्याशास्त्र
१३. माहिती तंत्रज्ञान
१४. NSQF व्यवसाय / कौशल्य विकास विषय
१५. दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी विशेष विषय

**विज्ञान शाखा**

१.भौतिकशास्त्र
२. रसायनशास्त्र
३. जीवशास्त्र
४. भूगोल
५. गणित आणि संख्याशास्त्र
६. भूगर्भशास्त्र
७. कृषिविज्ञान व तंत्रज्ञान
८. पशुविज्ञान व तंत्रज्ञान
९. माहिती तंत्रज्ञान
१०. NSQF व्यवसाय / कौशल्य विकास विषय
११. दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी विशेष विषय

**वाणिज्य शाखा**

१.अर्थशास्त्र
२.पुस्तकपालन व लेखाकर्म
३.वाणिज्य संघटन व व्यवस्थापन
४.सचिवांची कार्यपध्दती

५.सहकार
६.गणित आणि संख्याशास्त्र
७.माहिती तंत्रज्ञान
८. NSQF व्यवसाय / कौशल्य विकास विषय
९. दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी विशेष विषय

प्राथमिक, उच्च प्राथमिक व माध्यमिक स्तरावर मराठी हा भाषा विषय अनिवार्य राहील. याव्यतिरिक्त अन्य कोणताही एक भाषा विषय विद्यार्थ्यांना घेता येईल. उच्च माध्यमिक स्तरावर कोणतेही २ भाषा विषय घेण्याचे स्वातंत्र्य विद्यार्थ्यांना राहील.

विशेष तरतूद : दिव्यांग विद्यार्थ्यांसाठी कोणताही एक भाषा विषय अनिवार्य राहील व उरलेल्या विषयांतील कोणतेही चार विषय विद्यार्थ्यांना घेता येतील.

**८. परीक्षा पध्दती व मूल्यमापन :**

(अ) प्राथमिक स्तर -

१. मूल्यमापन - एकूण १०० गुण - ५० गुण (लेखी) व ५० गुण (तोंडी / प्रात्यक्षिक / प्रकल्प / अंतर्गत मूल्यमापन इत्यादी)

२. एकूण ५ विषयात उत्तीर्ण होणे आवश्यक

(ब) उच्च प्राथमिक स्तर -

१. मूल्यमापन - एकूण १०० गुण - लेखी परीक्षा ६० गुण (लेखी) व ४० गुण (तोंडी / प्रात्यक्षिक / प्रकल्प / अंतर्गत)

२. पाच विषयात उतीर्ण होणे आवश्यक.

(क) माध्यमिक स्तर -

१.पूर्व व्यावसायिक गटातील विषयांना लेखी परीक्षा ५० गुणांची व प्रात्यक्षिक परीक्षा ५० गुणांची राहील

२.भाषा विषयाकरिता ५० गुण उपयोजित लेखनाकरिता व ५० गुण पाठ्यांशकरिता राहतील.

३.विज्ञान व तंत्रज्ञान विषयाची लेखी परीक्षा ८० गुण + प्रात्यक्षिक परीक्षा २० गुणांची राहील.

४. किमान ५ विषयांत उत्तीर्ण झाल्यासच उत्तीर्णतेचे प्रमाणपत्र मिळेल.

५.विद्यार्थी जास्तीत जास्त ५ विषय घेऊ शकेल.

६.महाराष्ट्र राज्य मुक्त शाळेचे माध्यम मराठी, हिंदी, इंग्रजी व उर्दू राहील.

७.सर्व विषयांची परीक्षा एकाच वेळी देण्याचे बंधन असणार नाही. पाच वर्षात एकूण नऊ परीक्षांना हव्या त्या विषयांना परीक्षार्थी प्रविष्ट होऊ शकेल.

८.दरवर्षी एप्रिल व नोव्हेंबर असे वर्षातून दोन वेळा परीक्षेचे आयोजन करण्यात येईल. या परीक्षा विविध पाठ्यांशावर (Modules) देता येतील. संचित मूल्यांकनाची (Transfer of Credit) व्यवस्था असेल.

९. अभ्यासक्रमातील विविध विषयांसाठी अंतर्गत मूल्यमापन- स्वाध्याय पुस्तिका सोडवणे आवश्यक राहील.

(ड) उच्च माध्यमिक स्तर -

१.भाषा विषयाची ८० गुणांची लेखी परीक्षा असेल व २० गुणांची तोंडी परीक्षा असेल.

२.विज्ञान विषयाची ८० गुणांची लेखी परीक्षा व २० गुणांची प्रात्यक्षिक असेल.

३.अन्य ऐच्छिक विषयासाठी ८० गुणांची लेखी परीक्षा व २० गुणांची प्रकल्प किंवा अंतर्गत मूल्यमापन असेल.

४.परीक्षेचे माध्यम मराठी, हिंदी, इंग्रजी व उर्दू असेल.

५.सर्व विषयाची परीक्षा एकाच वेळी किंवा टप्प्याटप्प्याने देता येईल.

९. **विशेष सुविधा :** नियमित शाळेत शिकत असताना शास्त्रीय कला, लोककला, चित्रकला, क्रीडा या क्षेत्रात रस असणारे व यामध्ये करिअर करु इच्छिणारे अथवा प्राविण्य मिळवणाऱ्या विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होवू नये याकरिता केवळ इयत्ता १० वी अथवा इयत्ता १२ वी मध्ये अशा विद्यार्थ्यांना राज्य मुक्त विद्यालय मंडळात प्रवेश घेता येईल व विद्यार्थी मुक्त विद्यालयाची परीक्षा देऊ शकतील.

१०. **नोंदणी फी व परीक्षा फी**

(अ) प्राथमिक व उच्च प्राथमिक स्तर:

| | |
|---|---|
| १. परीक्षा फी प्रति विषय | - १०० रुपये. |

(ब) माध्यमिक व उच्च माध्यमिक स्तर

| | |
|---|---|
| १. नोंदणी शुल्क | - २००० रुपये. |
| २. पुनर्नोंदणी फी | - १००० रुपये. |
| ३. परीक्षा शुल्क -प्रति विषय | - १०० रुपये. |
| ४. प्रात्यक्षिक शुल्क -प्रति विषय | - २५ रुपये. |
| ५. तुरळक (Isolated) विषय - प्रति विषय | - १०० रुपये. |

वरील शुल्कात बदल करावयाचे असल्यास राज्य मुक्त विद्यालयास शासनाची मंजूरी घेणे बंधनकारक राहील.

**११. प्रशासकीय संरचना व व्यवस्थापन**

महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ योजनेसाठी राज्य पातळीवर अध्यक्ष म्हणून शिक्षण संचालक या दर्जाचा अधिकारी संस्थेचे प्रमुख राहतील. इतर अधिकारी / कर्मचारी वर्ग प्रतिनियुक्ती / कंत्राटी तत्वावर आवश्यकतेप्रमाणे नियुक्त करण्याचा अधिकार राज्य मंडळास शासन मान्यतेने राहील.

या योजनेची योग्यरितीने अंमलबजावणी करण्यासाठी खालील प्रमाणे यंत्रणा राहील.

(अ) नियामक मंडळ

| | |
|---|---|
| १. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ पुणे. | - अध्यक्ष |
| २. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय परीक्षा मंडळ, पुणे. | - सदस्य |
| ३. राज्य प्रकल्प संचालक, सर्व शिक्षा अभियान, महाराष्ट्र राज्य, मुंबई | - सदस्य |
| ४. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, महाराष्ट्र राज्य, मुंबई | - सदस्य |
| ५. शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य पुणे | - सदस्य |
| ६. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण, पुणे | - सदस्य |
| ७. सहसचिव / उपसचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | - सदस्य |
| ८. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई | - सदस्य |
| ९. संचालक, एससीईआरटी, पुणे | - सदस्य |

१०. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे - सदस्य
११. सहसंचालक, पुणे विभाग राष्ट्रीय मुक्त शालेय शिक्षण संस्था - सदस्य
१२. शिक्षण संचालक, उच्च शिक्षण किंवा प्रतिनिधी - सदस्य
१३. संचालक, तंत्र शिक्षण किंवा प्रतिनिधी - सदस्य
१४. संचालक, कला किंवा प्रतिनिधी - सदस्य
१५. विद्यापीठ प्रतिनिधी -२ - सदस्य
१६. मुक्त शिक्षण क्षेत्रातील तज्ज्ञ -५ - सदस्य
१७. सचिव, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय, - सदस्य सचिव

अशासकीय सदस्यांचा कालावधी ३ वर्षाचा असेल. सदर समितीच्या वर्षातून किमान दोन सभा होतील. अशासकीय सदस्यांची नेमणूक शासन करेल.

कार्य:

१. धोरणात्मक निर्णय घेणे .
२. अभ्यासमंडळांनी तयार केलेले अभ्यासक्रम, स्वाध्यापत्रिका, शैक्षणिक साहित्य इ. मान्यता देणे.
३. प्रशासकीय व वित्तीय धोरणात्मक निर्णय घेणे.
४. मूल्यमापन यंत्रणा निर्माण करणे.
५. शिक्षकांसाठी प्रशिक्षण आयोजित करणे इत्यादीबाबत शिफारशी करणे.

(ब) कार्यकारी समिती

१. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय परीक्षा मंडळ, पुणे. - अध्यक्ष
२. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण, पुणे - सदस्य
३. राज्य प्रकल्प संचालक, सर्व शिक्षा अभियान, महाराष्ट्र राज्य, मुंबई - सदस्य
४. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, महाराष्ट्र राज्य, मुंबई - सदस्य
५. शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण महाराष्ट्र राज्य, पुणे - सदस्य
६. शिक्षण संचालक, व्यवसाय शिक्षण, मुंबई - सदस्य
७. संचालक, एससीईआरटी, पुणे - सदस्य
८. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ,पुणे - सदस्य
९. लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय, पुणे - सदस्य
१०. सचिव, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय, पुणे - सदस्य सचिव

सदर समितीच्या वर्षातून किमान चार बैठका होतील.तसेच अध्यक्षांना आवश्यक वाटेल तेव्हा बैठक बोलविता येईल.

(क) विद्या समिती

१.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय, पुणे - अध्यक्ष
२.सर्व अभ्यास मंडळाचे निमंत्रक - सदस्य

३. राज्य प्रकल्प संचालक, सर्व शिक्षा अभियान, महाराष्ट्र राज्य, मुंबई - सदस्य
४.राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, महाराष्ट्र राज्य, मुंबई - सदस्य
५.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे - सदस्य
६.शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे - सदस्य
७.शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण, पुणे - सदस्य
८.शिक्षण संचालक, व्यवसाय शिक्षण, मुंबई - सदस्य
९.संचालक, एससीईआरटी, पुणे - सदस्य
१०.शिक्षण तज्ज्ञ - २ - सदस्य
११.सचिव, महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय, पुणे - सदस्य सचिव

**१२. अभ्यास मंडळ**

प्रत्येक विषयासाठी स्वतंत्र अभ्यास मंडळ असेल.

**१३. अध्ययन साहित्य**

मुक्त शाळेसाठी निश्चित करण्यात आलेल्या विषयासाठी अतिशय सुलभ असे स्वयंअध्ययन साहित्य निर्माण करण्यात येईल. त्यात स्वयंअध्ययन पुस्तिका व सी.डी. यांचा समावेश असेल. दूरदर्शन व आकाशवाणीच्या सहकार्याने काही अभ्यासवर्ग ठेवता येतील असेही नियोजन केले जाईल.

१४. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ स्थापन करण्याच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाची मंजूरी मिळालेली आहे. सदर निर्णयानुसार राज्यात महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ स्थापन करण्यास मंजूरी देण्यात येत असून या अंतर्गत इयत्ता ५ वी, इयत्ता ८ वी, इयत्ता १० वी व इयत्ता १२ वी या वर्गांकरिता परिक्षा घेण्याचे अधिकार राज्य मुक्त विद्यालय मंडळास राहतील. तसेच या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता मुक्त विद्यालय केंद्र स्थापन करणे, अध्ययन साहित्य निर्माण करणे आदि. बाबींसंदर्भातील नियमावली, मार्गदर्शक सूचना या राज्य मंडळाने तयार कराव्यात.

१५. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ हे राज्य मंडळाचा एक भाग म्हणून कार्यान्वित राहील. सद्यस्थितीत राज्य मंडळाकडे असणारे मनुष्यबळ, भौतिक सुविधा व उपलब्ध निधी यांच्या आधारेच महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळ स्थापन करण्यात यावे. नोंदणी शुल्कामुळे प्राप्त होणाऱ्या निधीतून भविष्यामध्ये राज्य मुक्त विद्यालय मंडळ आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण होईल याद्दष्टीने राज्य मंडळाने नियोजन करावे. राज्य मुक्त विद्यालय मंडळामुळे राज्य शासनावर कोणताही आर्थिक बोजा पडणार नाही, अथवा नव्याने दायित्व निर्माण होणार नाही.

१६. महाराष्ट्र राज्य मुक्त विद्यालय मंडळाबाबतीत वेळोवेळी आवश्यक निर्णय घेण्याचे अधिकार शालेय शिक्षण विभागास राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०७१४१५१७५७७४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2017.07.14 15:16:01 +05'30'

**( नंदकुमार )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा. राज्यपालांचे सचिव,मंत्रालय,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३. मा.मंत्री,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,यांचे विशेष कार्य अधिकारी.
४. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव.
५. मा.प्रधान सचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,मंत्रालय,मुंबई
६. मा.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
७. सर्व महानगरपालिका आयुक्त
८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
९. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
१०. राज्य प्रकल्प संचालक, राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, मुंबई
११. अध्यक्ष / सचिव, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
१२. शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक) , महाराष्ट्र राज्य, पुणे .
१३. संचालक, विद्याप्राधिकरण, पुणे .
१४. संचालक,बालभारती,पुणे.
१५. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई -
१६. शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, पुणे
१७. संचालक, तंत्र शिक्षण, मुंबई -
१८. संचालक, कला संचालनालय, मुंबई
१९. सर्व विभागीय अध्यक्ष, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ .
२०. सर्व विभागीय सचिव, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ .
२१. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
२२. सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक) जिल्हा परिषद
२३. शिक्षण निरिक्षक, मुंबई (पश्चिम,दक्षिण,उत्तर)
२४. सर्व मुख्याध्यापक शिक्षणाधिकारी यांच्यामार्फत
२५. निवड नस्ती ,एसडी-२.